**हंगाम २०१७-२०१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या, परंतु ज्यांच्याकडून हरभरा खरेदी केलेली नाही, अशा शेतकऱ्यांना रुपये १००० प्रति क्विंटल अर्थसहाय्य देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.२९७/२४- स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- ०१ नोव्हेंबर, २०१८.

<u>संदर्भ</u> :- (१) दिनांक ५/६/२०१८ रोजीच्या राज्य मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय
(२) शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक:-आकनि २०१८/प्र.क्र.६/अर्थ १३, दिनांक ८ जून, २०१८
(३) शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक:-शाहमी-२०१८/सपववि/प्र.क्र.४६/अर्थबळ, दिनांक १५ जून, २०१८
(४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.१६९/२४- स, दिनांक १९/०६/२०१८

**<u>प्रस्तावना</u> :-**

हंगाम २०१७-२०१८ साठी राज्यात किमान आधारभूत किंमत योजनंतर्गत Price Support Scheme मध्ये तूर व हरभरा खरेदीसाठी नाफेडने शेतकऱ्यांनी NeMLपोर्टलवर नोंदणी करणे अनिवार्य केले होते. दिनांक १५/०५/२०१८ पासून तूरीची खरेदी बंद झाली असून, त्यावेळी १,९२,०७६ शेतकऱ्यांची तूर खरेदी करणे शिल्लक होती. तसेच दिनांक १३/०६/२०१८ पासून हरभऱ्याची खरेदी बंद झाली असून, उर्वरित २,१८,६०८ शेतकऱ्यांची तूर खरेदी करणे शिल्लक होती. पुरेशा प्रमाणात गोदामे उपलब्ध नसल्याने अपेक्षित प्रमाणात तूर/हरभऱ्याची न झालेली खरेदी, राज्यातील मान्सूनचे आगमन आणि शेतकऱ्यांकडून होणारी अर्थसहाय्याची मागणी विचारात घेऊन हंगाम २०१७-२०१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या तूर व हरभरा उत्पादक शेतकऱ्यांना रुपये १०००/-प्रति क्विंटल अर्थसहाय्य राज्यशासनाने मंजूर केले होते. त्यानुषंगाने संदर्भाधीन दिनांक १९/०६/२०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील तूर उत्पादक शेतकऱ्यांना रुपये १०००/-प्रति क्विंटल अर्थसहाय्य मंजूर करण्यात आले होते. त्याचप्रमाणे हरभरा उत्पादक शेतकऱ्यांना रुपये १०००/-प्रति क्विंटल अर्थसहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या संदर्भात मंत्रिमंडळातील बैठकीतील चर्चा व निर्देश लक्षात घेऊन सदर योजनेसाठी शासन निर्णय, दिनांक १९/०६/२०१८ प्रमाणे पुढील कार्यवाही निश्चित करण्यात येत आहे:-

a. हंगाम २०१७-२०१८ मध्ये किमान आधारभूत किंमत योजनेंतर्गत NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या, परंतु ज्यांच्याकडून हरभरा खरेदी केलेली नाही, अशा शेतकऱ्यांना अनुदान देण्यासाठी १० क्विंटल प्रति हेक्टर ही मर्यादा निश्चित करण्यात यावी.

b. तसेच अर्थसहाय्य देण्याकरिता NeML पोर्टलवर लागवडीखालील क्षेत्राच्या नोंदीप्रमाणे परंतु जास्तीत जास्त २ हेक्टर प्रति शेतकरी या मर्यादेत अनुदान निश्चित करण्यात यावे.

c. ज्या शेतकऱ्यांना विहित मुदतीत SMS पाठविण्यात आला होता आणि त्यांनी पूर्वी किमान एकवेळ हरभरा खरेदी केंद्रावर आणून विकलेला आहे. त्याचबरोबर SMS पाठविला असतानाही कोणतेही ठोस कारण नसतानाही ज्या शेतकऱ्यांनी खरेदी केंद्रावर हरभरा आणला नाही, अशा शेतकऱ्यांना अपात्र ठरविण्यात यावे.

d. NeML पोर्टलवर नोंदणी केलेल्या शेतकऱ्यांना खरेदी केंद्रावर हरभरा आणण्यासाठी विहित मुदतीत SMS पाठविता आला नाही, अशा शेतकऱ्यांना अर्थसहाय्यासाठी पात्र ठरविण्यात यावे.

e. NeML पोर्टलवर हरभरा लागवडीखालील क्षेत्राची नोंद केलेल्या प्रमाणातच शेतकऱ्यांना अनुदान अनुज्ञेय करावे.

f. अनुदानाचे वितरण NeMLपोर्टलवर नोंदणी असलेल्या शेतकऱ्यांना पोर्टलद्वारेच प्रामुख्याने त्यांच्या आधार जोडणी असलेल्या बँक खात्यात व अपवादात्मक परिस्थितीत उपलब्ध बँक खात्यात करण्यात यावे.

g. निधी वितरणाची संपूर्ण जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांची राहील.

२. या योजनेंतर्गत सुरुवातीस होणारा खर्च नमूद लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रुपये ७० कोटी आकस्मिकता निधीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक व्ही-२**

२४२५ सहकार
००
१९५-सहकारी संस्थांना सहाय्य
(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य
(०१)(०४) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघामार्फत शेतमालाची खरेदी करण्यासाठी लागलेल्या अनुषंगिक खर्चाची रक्कम अदा करण्याकरिता अर्थसहाय्य (अनिवार्य) (२४२५ २५४२)
३३ अर्थसहाय्य

३. तसेच उर्वरित अर्थसहाय्य वितरित करण्यासाठी, वित्त विभागाच्या शासन निर्णय, दिनांक १५/६/२०१८ अन्वये मंजूर केलेल्या रुपये ४८० कोटी शासन हमीच्या आधारे पणन महासंघाने राष्ट्रीयीकृत बँकाकडून कर्ज उपलब्ध करुन घ्यावे.

४. शासन हमीद्वारे उभा करण्यात आलेले कर्ज व त्यावरील व्याजाची रक्कम राज्यशासनाकडून अदा करण्यात येईल.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. अनौस-३६९/ २०१८/व्यय-२, दिनांक १९/६/२०१८ याव्दारे दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११६५५२८८००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2018.11.01 16:58:44 +05'30'

**( सुनंदा मो. घड्याळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) मंत्रालय, मुंबई
५) मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई
७) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८) मा.अ.मु.स. ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई,
११) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ.पुणे
१२) सर्व जिल्हाधिकारी,
१३) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१५) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१६) सर्व जिल्हा मार्केटिंग अधिकारी, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.
१७) सर्व सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था
१८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
२१) अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२) निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.